**कोकण ग्रामीण पर्यटन विकास कार्यक्रम अंतर्गत सिंधुदुर्ग जिल्ह्यातील प्रशासकीय मान्यता दिलेल्या कामांना निधी वितरीत करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**ग्राम विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः कोग्रापविका-२०२४/प्र.क्र.२७/यो-११**
बांधकाम भवन, २५, मर्झबान पथ
फोर्ट, मुंबई-४०० ००१.
दिनांक :- ३० मार्च, २०२४.

**वाचा :**

१. ग्रामविकास विभाग, शासन निर्णय क्र. कोवियो-२०१५/प्र.क्र.७५ /यो-६, दि.२३ नोव्हेंबर, २०१५.
२. ग्रामविकास विभाग, शासन निर्णय क्र. ग्रासयो-२०१५/ प्र.क्र.७५ /यो-६, दि.२९ जुलै, २०२०.
३. जिल्हाधिकारी तथा अध्यक्ष जिल्हास्तरीय कार्यकारीणी समिती, कोकण ग्रामीण पर्यटन विकास, सिंधुदुर्ग- यांचे पत्र क्र. नियोजन/कार्या.५/कोग्रा पर्यटन/प्रस्ताव/२०२२-२३/४१८, दि.१७/०३/२०२२.
४. ग्राम विकास विभाग शासन निर्णय क्रमांक: कोग्रापविका-२०२४/प्र.क्र.२७/यो-११ दि.१५ मार्च,२०२४.
५. ग्राम विकास विभाग शासन निर्णय क्रमांक: कोग्रापविका-२०२४/प्र.क्र.२७/यो-११ दि.२८ मार्च,२०२४.

**प्रस्तावना :**

कोकण ग्रामीण पर्यटन विकास कार्यक्रम या योजनेअंतर्गत संदर्भ क्र.३ येथील पत्रातील सिंधुदुर्ग जिल्हापरिषदेने शिफारस केलेल्या रु. ५,००,००,०००/- (रु.पाच कोटी फक्त) रकमेच्या विविध कामांना संदर्भ क्र.४ च्या शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता देण्यात आली आहे. त्याअनुषंगाने सदर कामांसाठी निधी उपलब्धतेनुसार संदर्भ क्र.५ च्या शासन निर्णयान्वये रु.२०,४४,७२५ (रु.वीस लक्ष चव्वेचाळीस हजार सातशे पंचवीस फक्त) इतका निधी वितरीत करण्यात आला आहे. त्यानंतर सुधारित अंदाजाप्रमाणे निधी मागणीच्या प्रस्तावावर वित्त विभागाने उपलब्ध करुन दिलेल्या निधीतून रु. १,००,००,०००/- (रु.एक कोटी फक्त) निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

कोकण ग्रामीण पर्यटन विकास कार्यक्रम या योजनेअंतर्गत सिंधुदुर्ग जिल्ह्यातील कामांना संदर्भ क्र.४ च्या शासन निर्णयान्वये ५,००,००,०००/- (रु.पाच कोटी फक्त) रकमेची प्रशासकीय मान्यता देण्यात आली आहे.

२. सन २०२३-२४ करिता कोकण ग्रामीण पर्यटन विकास कार्यक्रम योजनेअंतर्गत (२५१५२४३२) या लेखाशीर्षाखाली रुपये १५.०० कोटी इतका निधी अर्थसंकल्पीत करण्यात आला आहे. या लेखाशीर्षाखाली वित्त विभागाने उपलब्ध करून दिलेल्या निधीतून संदर्भ क्र.४ च्या शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता दिलेल्या कामांसाठी रु.१,००,००,०००/-(रु.एक कोटी फक्त) इतका निधी बीडीएस प्रणालीवर वितरीत करण्यात येत आहे.

३. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, सिंधुदुर्ग यांनी सदर निधी वितरीत करताना संदर्भ क्र.१ व ४ येथील शासन निर्णयात नमुद अटी व शर्तींचे पालन करावे. सदर निधी प्रशासकीय मान्यता दिलेल्या कामांसाठीच

खर्च करून, कामांच्या प्रगतीनुसार वितरीत केलेल्या निधीच्या उपयोगिता प्रमाणपत्रासह उर्वरित निधीची मागणी करावी.

४. सदर अनुदान सन २०२३-२४ करिता लेखाशीर्ष मागणी क्र.एल-०३ "२५१५ मुख्य लेखाशीर्ष मागणी-२५१५-इतर ग्राम विकास कार्यक्रम-१९६- जिल्हापरिषद/जिल्हास्तरीय पंचायतींना सहाय्य (००) (०७) कोकण ग्रामीण पर्यटन विकास कार्यक्रम (२५१५ २४३२) -३१- सहायक अनुदाने (वेतनेतर) (दत्तमत) या लेखाशीर्षाखाली मंजूर तरतुदीतुन भागविण्यात यावा व त्याच लेखाशीर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

५. सदर अनुदानाच्या विनियोजनाबाबतचे उपयोगिता प्रमाणपत्र महालेखापाल कार्यालयास सादर करावे व त्याची प्रत शासनास पाठवावी.

६. प्रस्तुत प्रकरणी वित्त विभागाच्या शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०२३/प्र.क्र.४०/अर्थ-३, दि.१२.०४.२०२३ मधील अटी व शर्तींचे पालन करण्यात यावे.

७. सदर शासन निर्णय नियोजन विभागाच्या अनौ.संदर्भ क्र.१४१/२०२४/१४४४ दि.२७.०३.२०२४ व वित्त विभागाच्या अनौ.संदर्भ क्र. २८६/२०२४/व्यय-१५, दि.३०.०३.२०२४ अन्वये दिलेल्या सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

८. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२४०३३०१५५३०८५६२० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

KALU GONYA VALVI

Digitally signed by KALU GONYA VALVI
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=RURAL DEVELOPMENT DEPARTMENT, 2.5.4.20=714701fc3db9c38a46f4cd82e1e450b51a9e92eede8c323934f82edb538d3b20, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=8C5D0F275C3D9A21DB07FECF7919C2D83796E88930D62D44E7A4A6D4CBEE7E0E, cn=KALU GONYA VALVI
Date: 2024.04.01 11:30:12 +05'30'

**(का.गो.वळवी)**
सह सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१) मा. राज्यपाल यांचे सचिव,
२) मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव,मंत्रालय, मुंबई,
३) मा.उपमुख्यमंत्री(गृह) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
४) मा.उपमुख्यमंत्री(वित्त)यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
५) मा.मंत्री (ग्रामविकास) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,

६) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र-१ मुंबई/महाराष्ट्र-२ नागपूर,
७) महालेखापाल (लेखा परिक्षा) महाराष्ट्र-१,मुंबई/महाराष्ट्र-२ नागपूर,
८) विभागीय आयुक्त, आयुक्त कार्यालय, कोकण विभाग, कोकण,
९) जिल्हाधिकारी , सिंधुदुर्ग,
१०) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, सिंधुदुर्ग,
११) मुख्य लेखा व वित्त अधिकारी, जिल्हा परिषद , सिंधुदुर्ग,
१२) जिल्हा कोषागार अधिकारी , सिंधुदुर्ग,
१३) नियोजन विभाग,(का-१४४४) मंत्रालय, मुंबई-३२,
१४) वित्त विभाग (व्यय १५, अर्थसं-१६ , अर्थसं-१७) मंत्रालय,मुंबई ३२,
१५) कार्यासन क्र. वित्त-१, ग्राम विकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई.